**पंचायत राज संस्थांच्या कामासंदर्भात**
**<u>वृत्तपत्रात दयावयाच्या जाहिरातीबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**ग्रामविकास व जलसंधारण विभाग**
**शासन परिपत्रक क्र:- झेडपीए २००६/प्र.क्र ३६६/वित्त-९,**
**मंत्रालय, मंबई-४०० ०३२. दिनांक :- ३१ डिसेंबर, २००९.**

**वाचा :-**

१) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक:अेसएससी -१०८८/ प्र.क्र.३५३/ ०८, दिनांक : ५ जून,१९८९

२) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय , क्रमांक : झेडपीए -१०८९/प्र.क्र १०१४/३३, दिनांक: २८/२/१९९०

३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक :पीयूबी-१०००/प्र.क्र.७३/२०००/३४, दिनांक १ मे, २००१,

४) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: झेडपीए २००५/प्र.क्र ३१५/वित्त-९, दिनांक: २४/११/२००५

५) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: झेडपीए २००५/प्र.क्र ३६६ / वित्त-९, दिनांक: ३०/१२/२००६ (जाहिरातीबाबत)

६) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्रमांक: झेडपीए २००५/प्र.क्र ३७५ / वित्त-९, दिनांक: ३०/१२/२००६ (निविदेच्या कालावधी व जाहिराती बाबत )

७) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: झेडपीए २००५/प्र.क्र ३६६ / वित्त-९, दिनांक: ५/२/२००८

८) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: झेडपीए २००८/प्र.क्र ४२८ / वित्त-९, दिनांक: ३०/१२/२००८

**प्रस्तावना:-**

जिल्हा परिषद व पंचायत समित्यांकडून विविध कामकाजासंदर्भात वृत्तपत्रात जाहिराती दिल्या जातात. या जाहिराती देण्याबाबत **महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती लेखा संहिता १९६८ नियम क्रमांक १३८(१) ते (६)** मध्ये तरतुद करण्यात आली आहे. तथापि जिल्हा परिषदांमार्फत देण्यात येणा-या जाहिराती वेगवेगळया स्तरावर फक्त मराठी व इंग्रजी दैनिक वर्तमान पत्रातूनच देण्यात

येत होत्या. यासंदर्भात राज्य शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भित अनुक्रमांक ३ येथील शासन निर्णयामधील तरतुदीनुसार हिंदी दैनिक वर्तमान पत्रातूनही जाहिराती देण्याचा प्रस्तावावर या विभागाने संदर्भाधीन क्रमांक (५) अन्वये **दिनांक ३०/१२/२००६** रोजी शासन परिपत्रक निर्गमित केलेले आहे.

राज्य शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १ मे,२००१ च्या शासन निर्णयात दिलेले **विभागीय स्तर** दिनांक ३०/१२/२००६ च्या शासन परिपत्रकामध्ये दिलेले नसल्याने, याबाबत सूचना निर्गमित करण्यासाठी जिल्हा परिषदा व स्थानिक लोकप्रतिनिधींकडून मागणी करण्यात आलेली होती. यास्तव उपरोक्त शासन परिपत्रक अधिक्रमित करून, यासंदर्भात संदर्भ क्र. ७ वरील दिनांक ५/२/२००८ च्या शासन परिपत्रकान्वये नव्याने सूचना देण्यात आलेल्या होत्या.

दि.५.२.२००८ च्या शासन परिपत्रकान्वये, जिल्हा परिषद व पंचायत समित्यांच्या कामांच्या जाहिराती वितरीत करण्याचे अधिकार हे **जिल्हा माहिती अधिकारी, विभागीय माहिती उपसंचालक व संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुख्यालय (मुंबई )** यांना दिलेले होते. या अधिकारानुसार जिल्हा परिषदा व पंचायत समित्या जाहिराती देण्यासाठी प्रस्ताव जिल्हा माहिती अधिकारी, विभागीय माहिती उपसंचालक व संचालक माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुख्यालय (मुंबई ) यांच्याकडे पाठवित होत्या. तथापि त्यांच्याकडून काही जिल्हा परिषदांना, **" जिल्हा परिषद स्तरावरील जाहिराती प्रसिध्द करण्याबाबत स्थानिक स्वराज्य संस्थानी परस्पर कार्यवाही करावी,"** असे कळविलेले आहे. त्यामुळे जिल्हा परिषद व पंचायत समिती यांच्या विकास कामाच्या जाहिराती वेळेवर प्रसिध्द होत नव्हत्या तसेच कामेही विहित वेळेत होत नव्हती. यास्तव या बाबी विहित वेळेत होणे गरजेचे असल्याने संदर्भ क्रमांक ७ येथील दिनांक ५/२/२००८ चे शासन परिपत्रक अधिक्रमित करण्यात येऊन खालील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन परिपत्रक :-</u>** दिनांक ५.२.२००८ च्या शासन परिपत्रकातील जाहिराती वितरण करण्याचे जे अधिकार जिल्हा माहिती अधिकारी, विभागीय माहिती उप संचालक व संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, (महाराष्ट्र राज्य) यांना देण्यात आले होते, ते रद्द करुन आता जिल्हा परिषद व पंचायत

समित्यांच्या सर्व जाहिराती हया **खालील कोष्टकात** दर्शविल्याप्रमाणे देण्याबाबत या आदेशान्वये **जिल्हा परिषदेचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य प्रशासन )** यांना जिल्हा परिषदेच्या जाहिराती वितरीत करण्याचे व **पंचायत समिती स्तरावर, गट विकास अधिकारी** यांना पंचायत स्तरावरील जाहिराती वितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.

अशी कार्यवाही करताना, **जिल्हा परिषद स्तरावर** जिल्हा परिषदांचे **उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य प्रशासन)** व **पंचायत समिती स्तरावर, गटविकास अधिकारी** यांचेवर जाहिरातींचे वाटप नियमानुसार व रोष्टरप्रमाणे करण्याची जबाबदारी राहील.

मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद यांनी, याकामी उपमुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य प्रशासन) व गटविकास अधिकारी, पंचायत समिती यांचेवर नियंत्रण ठेवावे. तसेच रोष्टरनुसार कोणतेही वृत्तपत्र जाहिरातीपासून वंचीत राहणार नाही याची खबरदारी घेण्यात यावी. याकरीता राज्य शासनाच्या माहिती संचालनालयाने वेळोवेळी प्रसिध्द केलेल्या वृत्तपत्रांची **अद्ययावत** यादी जिल्हा परिषदेने प्राप्त करून घ्यावी व यादीची प्रत गटविकास अधिकारी यांना देण्यात यावी. राज्य शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाने जाहिरातींच्या दरासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयाच्या आधारे जाहिरातींच्या दराबाबत कार्यवाही करावी.

## कोष्टक

| | **एका कामाचे मूल्य** | **रोस्टरप्रमाणे जाहिराती वितरण करण्याचे अधिकार** | **जाहिरात प्रसिद्धीचे वृत्तपत्र** | |
|---|---|---|---|---|
| १ | जाहिरातीतील ज्या एका कामाचे मूल्य रु. ५ लाखापेक्षा कमी आहे अशी कमी खर्चाची कामे. | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य प्रशासन) जिलहा परिषद स्तरावरील जाहिराती व गट विकास अधिकारी पंचायत समिती स्तरावरील जाहिराती | जिल्हा स्तरावरील | एक "क" वर्ग दैनिक (मराठी /हिंदी) व एक "क" वर्ग मराठी साप्ताहिक |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २ | जाहिरातीतील ज्या एका कामाचे मूल्य रु. ५ लाखाच्यावर ते ५० लाखापर्यंत आहे अशा खर्चाची कामे | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य प्रशासन) जिल्हा स्तरावरील जाहिराती<br>व<br>गट विकास अधिकारी पंचायत समिती स्तरावरील जाहिराती | विभागीय स्तरावरील<br><br>जिल्हा स्तरावरील | एक "ब" वर्ग दैनिक (मराठी /हिंदी)<br>एक "ब" वर्ग मराठी साप्ताहिक<br>एक "ब" वर्ग दैनिक (मराठी /हिंदी)<br>एक "क" वर्ग साप्ताहिक<br>(रु. १ ते १५ लाख )<br>एक "ब" वर्ग साप्ताहिक<br>(रु.पंधरा लक्षावरील ते ५०लाखा पर्यंत ) |
| ३ | जाहिरातीतील ज्या एका कामाचे मूल्य रु. ५०,००,००१ पेक्षा अधिक आहे. अशी खर्चाची कामे | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य प्रशासन) जिल्हा स्तरावरील जाहिराती<br>व<br>गट विकास अधिकारी पंचायत समिती स्तरावरील जाहिराती | १)राज्य स्तरावरील<br><br>२)संबंधित विभागातील<br><br>३)ज्या जिल्हयाचे काम असेल त्या जिल्हयातील | १) **एका** "अ" वर्ग दैनिकास (मराठी /इंग्रजी /हिंदी)<br>२) **एका** "ब" वर्ग दैनिकास (मराठी /इंग्रजी / हिंदी)<br>३) **एका** "क" वर्ग दैनिकास (मराठी /इंग्रजी / हिंदी)<br>या तीन्ही स्तरावरील दैनिकात रोस्टरप्रमाणे त्या वर्गातील वृत्तपत्रांचे से.मी. चे प्रमाण लक्षात घेऊन जाहिरातीचे वितरण करण्यात यावे.<br>४. तसेच " अ" वर्गातील एका मराठी साप्ताहिकात जाहिरातीचे वितरण करण्यात यावे. |
| ४ | वरील १ ते ३ व्यतिरिक्त इतर सर्व प्रकारच्या जाहिरीती<br>(ज्या प्रशासकीय जाहिरातीमध्ये रकमेचा उल्लेख नसतो अशा जाहिराती. उदा. पदे भरतीची जाहिरात इत्यादि.) | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य प्रशासन) जिल्हा स्तरावरील जाहिराती<br>व<br>गट विकास अधिकारी पंचायत समिती स्तरावरील जाहिराती | १)राज्य स्तरावरील<br>२) संबंधित विभागातील<br>३)ज्या जिल्हयाचे काम असेल त्या जिल्हयातील | १)**एका "अ"** वर्ग दैनिकास (मराठी /इंग्रजी /हिंदी)<br>२)**एका "ब"** वर्ग दैनिकास (मराठी /इंग्रजी / हिंदी)<br>३)**एका "क"** वर्ग दैनिकास (मराठी /इंग्रजी / हिंदी)<br>या तीन्ही स्तरावरील दैनिकात रोस्टरप्रमाणे त्या वर्गातील वृत्तपत्रांचे से.मी. चे प्रमाण लक्षात घेऊन जाहिरातीचे वितरण करण्यात यावे.<br>४. तसेच " अ" "ब" व "क" वर्गातील एका साप्ताहिकात रोष्टरप्रमाणे जाहिरातीचे वितरण करण्यात यावे. |

२. वृत्तपत्रात दिल्या जाणा-या जाहिरातीचे रोस्टर शासनाच्या आदेशांनुसार/नियमांनुसार असावे. त्याकरीता रोस्टरची नोंदवही जिल्हा परिषद व पंचायत समिती या **दोन्ही स्तरावर** ठेवण्यात यावी. सदर रोष्टर नोंदवहया जिल्हा माहिती अधिकारी यांचेकडून दर तीन महिन्यानी तपासून घेण्यात याव्यात व रोस्टर व्यवस्थित पाळण्यात येत असल्याबाबत जिल्हा माहिती अधिकारी यांचेकडून त्या प्रमाणित करून घ्याव्यात. असे राज्य शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाच्या माहिती व जनसंपर्क कार्यालयाने निदेश दिलेले आहेत.

३. उपरोक्त कोष्टकामध्ये दर्शविण्यात आलेली दैनिकांची व साप्ताहिकांची वर्गवारी ही खालील प्रमाणे आहे.

**अ- दैनिके :-**

| अ.क्र | वृत्तपत्राचा वर्ग | किमान व कमाल खपाचा निकष |
|---|---|---|
| १ | क वर्ग दैनिके | (१)जिल्हा व त्याखालील स्तरावरुन प्रसिध्द होणा-या दैनिकांसाठी किमान खप २००१ ते २०,००० प्रती एवढा असणे आवश्यक.<br>(२)विभागीय मुख्यालयांच्या ठिकाणांहून प्रसिध्द होणा-या दैनिकांसाठी किमान खप ३००१ ते २०,०००प्रती एवढा असणे आवश्यक.<br>(३)मुंबईतून प्रसिध्द होणा-या दैनिकांसाठी किमान खप ५००१ ते २०,००० प्रतीं एवढा असणे आवश्यक. |
| २ | ब वर्ग दैनिके | किमान खप २०,००१ ते ५०,००० प्रतीं एवढा असणे आवश्यक आहे. |
| ३ | अ वर्ग दैनिके | किमान खप ५०,००१ प्रतींपेक्षा अधिक असणे आवश्यक |

**ब- साप्ताहिके :-**

| | | |
|---|---|---|
| १ | क वर्ग साप्ताहिके | किमान खप १००१ ते १०,००० प्रतीं एवढा आवश्यक |
| २ | ब वर्ग साप्ताहिके | किमान खप १०,००१ ते २५,००० प्रतीं एवढा असणे आवश्यक |
| ३ | अ वर्ग साप्ताहिके | किमान खप २५,००१ प्रतीं पेक्षा अधिक असणे आवश्यक. |

राज्य शासनाच्या ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या संदर्भिय पत्र क्रमांक ८ वरील परिपत्रकात नमूद केल्याप्रमाणे निविदा संचाची किंमत निश्चित केली आहे त्यानुसार कार्यवाही करावी.

४. **मुख्य कार्यकारी अधिकारी** यांनी **जिल्हा परिषद स्तरावर,** रोष्टरचे नियमाप्रमाणे पालन होईल याची खबरदारी घ्यावी व त्याचा दर तीन महिन्यानी आढावा घ्यावा तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी

यांचे स्वाक्षरीने सदरील अहवाल नोंदवही दर तीन महिन्यानी **जिल्हा माहिती अधिकारी** यांच्याकडे प्रमाणित करण्यासाठी सादर करावी व तशी ती प्रमाणित करुन घ्यावी.

तसेच गट विकास अधिकारी यांनी त्यांच्या स्वाक्षरीने, पंचायत समिती स्तरावरील अहवाल नोंदवही तीन महिन्यानी **उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य प्रशासन)** जिल्हा परिषद यांच्यामार्फत **जिल्हा माहिती अधिकारी** यांच्याकडे प्रमाणित करण्यासाठी पाठवून, ती प्रमाणित करुन घ्यावी.

५. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य प्रशासन) यांनी जिल्हा परिषद अंतर्गत असलेल्या सर्व पंचायत समितीच्या पातळीवर या शासन निर्णयाची तंतोतंत अंमलबजावणी होईल याकडे कटाक्षाने लक्ष द्यावे व तसा अहवाल दर तीन महिन्यांनी **मुख्य कार्यकारी अधिकारी**, जिल्हा परिषद यांना सादर करुन त्यास मान्यता घ्यावी. तसेच या परिपत्रकाची प्रत अंमलबजावणीस्तव जिल्हा परिषदेच्या अंतर्गत सर्व गट विकास अधिकारी यांना देण्यात यावी.

महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती लेखा संहिता १९६८ च्या नियम क्रमांक १३८ मधील १ ते ६ यात सुधारणा व बदल यथावकाश करण्यात येईल.

हे परिपत्रक शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक **अनौ.सं २००९/२७/३४ दि. २६/११/२००९** अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक संकेतांक **२००९१२३११७४६५८००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

39.92.09

( एकनाथ मोरे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

सर्व जिल्हा परिषदांचे अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य )
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
सह मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद,अमरावती, नागपूर.
सर्व जिल्हयांचे उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा,
महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता ) / ( लेखा व परिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता ) / ( लेखा व परिक्षा ) महाराष्ट्र-२, नागपूर.
जिल्हा माहिती अधिकारी, ( सर्व जिल्हे).
उप संचालक , माहिती व जनसंपर्क. (सर्व विभाग)
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्र-३४, मंत्रालय, मुंबई-३२
निवड नस्ती, कार्यासन क्रमांक वित्त-९ ग्राम विकास व जलसंधारण विभाग.